**जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास क्षमता बांधणीसाठी निधी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन पूरकपत्र क्रमांक :- आव्यप्र-२०१८/प्र.क्र ११४/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - १५ डिसेंबर, २०१८.

**संदर्भ** :- महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१८/ प्र.क्र ११४/आव्यप्र-१, दि २८.०५.२०१८.

**पूरकपत्र**

या विभागाच्या संदर्भाधिन शासन निर्णयातील कार्यक्रम / योजना विषयक बाबींसाठीचे प्रपत्र-२ हे प्रपत्र-१ असे वाचण्यात यावे तसेच सदर प्रपत्रामध्ये खालील बाबी समाविष्ट करण्यात येत आहेत.

४. संस्थात्मक मजबूतीकरण (अतिरिक्त बाब)

- आपत्ती व्यवस्थापनाचे काम प्रभावीपणे होण्याकरिता जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणासाठी शोध व बचाव कार्याशी संबंधित साहित्य खरेदी (जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास असलेल्या वित्तीय प्राधिकारात दरवर्षी जिल्ह्यास प्राप्त निधीच्या २५ टक्के मर्यादेत).

५. आपत्ती निवारण व सौम्यीकरण (नव्याने समाविष्ट)

- आपत्ती निवारण आणि आपत्ती सौम्यीकरणासाठी जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास तातडीने करावयाची संरचनात्मक बांधकामे व आपत्ती निवारण आणि सौम्यीकरणासाठी प्रती काम रु. ५.०० लाख पर्यंतच्या मर्यादेत कामे करणे (जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास असलेल्या वित्तीय प्राधिकारात दरवर्षी जिल्ह्यास प्राप्त निधीच्या २५ टक्के मर्यादेत).

सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८१२१७१६५९५४९४१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2018.12.17 17:07:29 +05'30'

**( श्रीरंग घोलप )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हाधिकारी
३. महालेखाकार, महाराष्ट्र -१, मुंबई
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. वित्तीय सल्लागार व सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
६. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती.